**महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, येथील विद्यार्थी निवासाकरीता आशीमारा हौसिंग कंपनीकडील भाडेतत्त्वावर घेतलेल्या वसतीगृहाचे भाडे वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन ज्ञापन क्रमांकः- भाडेक २०२४/ई-९१५२४४/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०३ मार्च, २०२५.

**वाचा :-** १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक- भाडेक २०२४/प्र.क्र.८५/विशि-२ दि.१९.०७.२०२४

२. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र.एनएलयुएम/ एफआयएन/०२/३७०(३)/२०१८/४९७ दि.३०.१२.२०२४.

**ज्ञापन** :- महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, येथील विद्यार्थी निवासाकरीता आशीमारा हौसिंग कंपनीकडील वसतिगृह ५१५ बेड्स रु.१५७७० प्रति महिना (सर्व शुल्काच्या समावेशासह) अशा भाडेदराच्या मर्यादेत दि.३१.०७.२०२४ ते दि.३०.०७.२०२५ या कालावधीसाठी भाडेतत्वावर घेण्यास तसेच महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई व आशीमारा हौसिंग यांच्यातील भाडेकरारासाठी एकूण प्रती वर्ष रु.९,७४,५६,१२८/- (सर्व शुल्कांसह) इतक्या रक्कमेस वाचा येथील दि.१९.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई विद्यापीठातील मुलांच्या निवास व्यवस्थेसाठी आशिमरा हाऊसिंग प्रा.लि, मुंबई यांच्याकडील भाडेतत्वावर घेतलेल्या वसतीगृहाचे सन २०२४-२०२५ मधील माहे ऑगस्ट, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील भाडेरक्कम रु.५,५१,७०,३९४/- उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.सदरचा निधी उपलब्ध करुन देण्याची वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागान निधी उपलब्ध करुन देण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई विद्यापीठातील मुलांच्या निवास व्यवस्थेसाठी आशिमरा हाऊसिंग प्रा.लि, मुंबई यांच्याकडील भाडेतत्वावर घेतलेल्या वसतीगृहाचे सन २०२४-२०२५ मधील माहे ऑगस्ट, २०२४ ते मार्च, २०२५ या कालावधीतील भाडेरक्कम **रु.५,५१,७०,३९४/- (रुपये पाच कोटी एकावन्न लक्ष सत्तर हजार तिनशे चौऱ्याण्णव फक्त)** विद्यापीठास खालील अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

१. शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे, ही रक्कम त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावी.
२. विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबत तपशीलवार खर्चाची माहिती व विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. तसेच वरील रक्कमेची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल - २ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, संबंधीत कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. सदरहू मंजूर रक्कम महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ ,मुंबई यांना तातडीने सुपूर्द करण्याची जबाबदारी संचालक, उच्च शिक्षण ,महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. दि.२५.०७.२०२४ परिपत्रकातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने (अनौपचारिक संदर्भ क्र.२२२/व्यय-५ दि.१३.०२.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०३१५१२५३९१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP
PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.03.03 15:13:41 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.कुलपती, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३.अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.